**राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे, स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित महाविद्यालयातील नियमित वर्ग सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण २०२१/प्र.क्र.६/विशि-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १३ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावनाः-**

राज्यातील ग्रामीण भागातील इयत्ता ५ वी ते १२ वी व शहरी भागात इयत्ता ८ वी ते १२ वी चे वर्ग दि. ०४ ऑक्टोबर, २०२१ पासून सुरु करण्यात आले आहेत. महाविद्यालयीन विद्यार्थी हे १८ वर्षांवरील असून बहुतेक विद्यार्थ्यांचे लसीकरण झाले असण्याची शक्यता आहे. तसेच, राज्यातील कोव्हिड-१९ बाधित रुग्णांची संख्या मोठ्या प्रमाणात कमी झालेली असून सद्यस्थितीत ही साथ नियंत्रणाखाली आल्याचे दिसून येत आहे. त्यामुळे राज्यातील सर्व विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांमध्ये कोव्हिड प्रतिबंधात्मक सर्वसाधारण उपाययोजना करुन विद्यार्थ्यांकरिता ऑफलाईन पध्दतीने नियमित वर्ग सुरु करणे विद्यार्थ्यांच्या हिताचे राहील. सबब, राज्यातील सर्व विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील नियमित वर्ग सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रकः-**

१. राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे, स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित महाविद्यालयातील नियमित वर्ग दिनांक २० ऑक्टोबर, २०२१ पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापि, विद्यापीठ/महाविद्यालयांचे वर्ग ५० टक्के किंवा त्यापेक्षा जास्त क्षमतेने सुरु करण्याबाबत स्थानिक प्राधिकरणांशी विचारविनिमय करुन विद्यापीठांनी त्यांचे स्तरावर निर्णय घ्यावा.

२. १८ वर्षावरील विद्यार्थी ज्यांनी कोव्हिड-१९ च्या लसीचे दोन्ही डोस घेतलेले आहेत, तेच विद्यार्थी/विद्यार्थीनी विद्यापीठ व महाविद्यालयात प्रत्यक्ष उपस्थित राहू शकतील.

३. प्रतिबंधित प्रक्षेत्रात येणारी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये ही ज्या आयुक्त, महानगरपालिका/ नगरपालिका किंवा जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांचे अंतर्गत येतात, त्यांच्याशी कोव्हिड-१९ च्या आजाराचा स्थानिक पातळीवरील प्रादुर्भाव व स्थानिक परिस्थिती, प्रतिबंधित प्रक्षेत्रांचे नियोजन व आरोग्यविषयक पायाभूत सुविधांची उपलब्धता या बाबी विचारात घेऊन, विद्यापीठे व महाविद्यालये सुरु करण्याबाबत विचारविनिमय करुन योग्य तो निर्णय संबंधित

विद्यापीठाने त्यांच्या स्तरावर घ्यावा व त्यानुसार महाविद्यालयांना सविस्तर मार्गदर्शक सूचना/ मानक कार्य प्रणाली (एसओपी) देण्यात यावी.

४. राज्यातील सुरु होणाऱ्या सर्व विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित महाविद्यालयांनी कोव्हिड-१९ च्या व्यवस्थापनाबाबतचे राष्ट्रीय निदेश, कामांच्या ठिकाणांबाबतचे अतिरिक्त निदेश, राज्य शासनाने वेळोवेळी काढलेली मार्गदर्शक तत्त्वे किंवा मानक कार्य प्रणाली (एसओपी) तसेच विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना लागू राहतील.

५. ज्या विद्यार्थी/विद्यार्थीनींना प्रत्यक्ष महाविद्यालयात उपस्थित राहता येणार नाही, त्यांना ऑनलाईन सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी.

६. वसतीगृहे टप्प्या-टप्प्याने सुरु करण्याबाबत संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आढावा घेऊन आवश्यक ती कार्यवाही करावी.

७. ज्या विद्यार्थी/विद्यार्थीनींनी कोव्हिड-१९ ची लस घेतलेली नाही, त्यांच्याकरिता विद्यापीठाने संबंधित संस्थांचे प्रमुख/ महाविद्यालयांचे प्राचार्य यांचे मदतीने स्थानिक जिल्हा प्रशासनाशी समन्वय साधून लसीकरणासाठी विशेष मोहिम राबवून लसीकरण प्राधान्याने पूर्ण करुन घ्यावे. तसेच विद्यापीठ/महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे देखील लसीकरण प्राधान्याने करुन घ्यावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२११०१३१६४६०१५५०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Pravinkumar Gulabrao Pawar

Digitally signed by Pravinkumar Gulabrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8de261729f06eda4a56aba947eceb6140d7406426b2f08c9317bea2458ec1f92, serialNumber=8f18625adb482a7ee2512cea93ce697388c95a99c89e41e85c05a3de8476488f, cn=Pravinkumar Gulabrao Pawar
Date: 2021.10.13 17:03:52 +05'30'

**( प्रविणकुमार पवार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

७. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

८. प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे

११. कुलगुरु, सर्व अभिमत विद्यापीठे

१२. कुलगुरु, सर्व स्वयंअर्थसहाय्यित विद्यापीठे

१३. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड

१४. कुलगुरु, कवि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, नागपूर

१५. कुलगुरु, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक

१६. सर्व महानगरपालिका आयुक्त

१७. सर्व जिल्हाधिकारी

१८. प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१९. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, पुणे

२०. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई

२१. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई

२२. निवडनस्ती (विशि-३).